**नवनिर्मित नगरपरिषदा/नगरपंचायतीमध्ये ग्रामपंचायतीच्या कर्मचाऱ्यांचे समावेशन करण्याबाबत धोरण विहित करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**नगरविकास विभाग,**

**शासन निर्णय, क्रमांक-एमसीओ-२०१५/प्र.क्र.१३९/नवि-१४**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १९ जानेवारी, २०१७

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र. एमसीओ-२०१५/प्र.क्र.१३९/नवि-१४, दि.०५/०७/२०१६.

२) नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांचे अनौसं./नपप्रसं/ग्रामपंचायत सेवा/२०१२/का.-६, दि.२६.१२.२०१६.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.एमसीओ-२०१५/प्र.क्र.१३९/नवि-१४, दि.०५/०७/२०१६ अन्वये राज्यातील तालुका मुख्यालयाच्या ठिकाणी नव्याने स्थापन करण्यात आलेल्या नगरपरिषदा/नगरपंचायती या नागरी स्थानिक संस्थांतील पदांच्या आकृतीबंधास मान्यता देण्याबाबत आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. या आदेशातील परिच्छेद क्र.६ मध्ये नव्याने निर्माण करण्यात आलेली पदे पुढीलप्रमाणे भरण्यात यावीत, असे नमूद करण्यात आले आहे:-

(१) ग्रामपंचायतीचे नगरपरिषद/नगरपंचायतीमध्ये रुपांतर करण्याबाबत प्राथमिक अधिसूचना निर्गमित करण्याच्या दिनांकापूर्वी संबंधित ग्रामपंचायतीमध्ये नियमित स्वरूपात कार्यरत असणाऱ्या व नगरपरिषद/नगरपंचायतीमध्ये समावेश करण्यासाठी अर्हताप्राप्त ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांच्या समावेशनाने.

(२) विभागीय क्षेत्रातील नगरपरिषदा/नगरपंचायतीमध्ये मंजूर आकृतीबंधापेक्षा जास्त कार्यरत असलेल्या अर्हताप्राप्त कर्मचाऱ्यांच्या समावेशनाने.

(३) अस्तित्वात असलेल्या नगरपरिषदा/नगरपंचायतीमध्ये रोजंदारी तत्त्वावर कार्यरत असणाऱ्या व समावेशनास अर्हताप्राप्त असणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या नेमणुकीने.

(४) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामधील अतिरिक्त असलेल्या पात्र उमेदवारांची नेमणूक करून भरण्यात येतील. मात्र सदरच्या प्रस्तावास मंत्रिमंडळाची मान्यता मिळाल्यानंतर त्यानुषंगाने आवश्यक आदेश निर्गमित केल्यानंतर एक महिन्याच्या आत जी अतिरिक्त कर्मचाऱ्यांची यादी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून देण्यात येईल, त्या यादीतील पात्र उमेदवारांची नेमणूक करून पदे भरण्यात येतील.

(५) उपरोक्त अ.क्र. (१) ते (४) नुसार कार्यवाही करूनही रिक्त राहिलेली उर्वरित नवनिर्मित पदे सरळसेवेने भरण्यात यावीत.

२. उपरोक्त पदे भरण्याची कार्यवाही विहीत मुदतीत होण्याच्या अनुषंगाने विभागीय आयुक्त यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात आली आहे:-

| | | |
|---|---|---|
| (१) विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक | - | अध्यक्ष |
| (२) उप आयुक्त (सर्वसाधारण/नगरपालिका प्रशासन) | - | सदस्य |
| (३) उप संचालक, नगरपरिषद प्रशासन | - | सदस्य सचिव |

३. उपरोक्त नव्याने निर्माण करण्यात आलेली पदे ग्रामपंचायतीतील कर्मचाऱ्यांच्या समावेशनाने भरताना अनुसरावयाच्या कार्यपद्धतीबाबत धोरण निश्चित करण्याकरिता उपरोक्त अ.क्र.२ येथील दि.२६.१२.२०१६ च्या अनौपचारिक संदर्भान्वये आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांनी शासनाकडे प्रस्ताव केलेला आहे.

**<u>शासन निर्णय</u>:-**

४. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने नवनिर्मित नगरपरिषदा/नगरपंचायतींच्या शासन मंजूर आकृतीबंधातील पदांवर भुतपुर्व ग्रामपंचायतीतील कर्मचाऱ्यांचे समावेशन करताना पुढीलप्रमाणे कार्यपद्धती अनुसरण्यात यावी:-

(१) नव्याने स्थापन करण्यात आलेल्या नगरपरिषदा/नगरपंचायतींच्या आकृतीबंधास शासनाची मान्यता प्राप्त झाल्यानंतर संबंधित मुख्याधिकारी यांनी भुतपुर्व ग्रामपंचायतीमधील कार्यरत कर्मचाऱ्यांना नगरपरिषदा/नगरपंचायतीच्या आस्थापनेवर सामावून घेण्याच्या अनुषंगाने संबंधित नगरपरिषद/नगरपंचायतीचा ठराव प्राप्त करून घेऊन, याबाबतचा प्रस्ताव जिल्हाधिकारी यांच्याकडे सादर करावा.

(२) उपरोक्त प्रस्तावासोबत, प्रस्तावामध्ये नमूद करण्यात आलेले ग्रामपंचायतीचे कर्मचारी हे नगरपरिषद/नगरपंचायत स्थापन करण्याबाबत प्राथमिक अधिसूचना निर्गमित करण्यापूर्वीच्या दिनांकापासून कार्यरत आहेत व या कर्मचाऱ्यांची नियुक्ती ही प्रचलित नियमानुसार झाली असल्याबाबत सोबतच्या सहपत्र-१ मध्ये नमूद करण्यात आलेल्या विहीत नमुन्यात संबंधित गट विकास अधिकारी यांचे प्रमाणपत्र सादर करावे.

(३) जिल्हाधिकारी यांच्याकडे उपरोक्तप्रमाणे प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर संबंधित जिल्हाधिकारी यांनी ग्रामपंचायत काळात नियुक्त झालेल्या व प्रस्तावात नमूद कर्मचाऱ्यांच्या मूळ नियुक्तीचे/कायम करण्याचे ठराव, नियुक्तीचे आदेश, सेवापुस्तक, हजेरी पट, वेतन प्रमाणपत्र/वेतन देयक, वय, शिक्षण, अर्हता व सद्य पद इत्यादी तपासून प्रमाणित कराव्यात. त्याबाबतचे विवरणपत्र सोबतच्या सहपत्र-२ मध्ये नमूद करण्यात आले आहे. जिल्हाधिकारी

यांनी त्यांच्याकडे प्राप्त प्रस्तावाची छाननी करून परिपूर्ण प्रस्ताव, त्यांच्या कार्यालयास मुख्याधिकारी यांच्याकडून प्रस्ताव प्राप्त झाल्यापासून १५ दिवसाच्या आत शिफारशीसह विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक यांना सादर करावा.

(४) उपरोक्त प्रस्तावाच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यासाठी आकृतीबंधातील राज्यस्तरीय संवर्गातील पदे वगळता उर्वरित पदांसाठीची अर्हता ही आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांच्याकडून विहीत करण्यात येईल.

(५) जिल्हाधिकारी यांच्याकडून प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक यांनी संबंधित कर्मचाऱ्याचे पदनाम, वेतनश्रेणी व आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांच्याकडून विहीत करण्यात येणारी अर्हता विचारात घेऊन संबंधित कर्मचाऱ्याच्या समावेशनास मान्यता देण्याबाबतचे आदेश महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ च्या कलम-७६ नुसार निर्गमित करावेत. याकरिता आदेशांचा नमुना आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांच्याकडून विहीत करण्यात येईल.

(६) विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक यांनी समावेशनाचा आदेश निर्गमित करताना संबंधित नगरपरिषद/नगरपंचायतीचे लोकसंख्या विचारात घेऊन, शासन निर्णय दि.०५.०७.२०१६ च्या सहपत्र-अ ते ड यापैकी संबंधित नगरपरिषदेत अनुज्ञेय आकृतीबंध निश्चित करून त्याचा समावेश आपल्या आदेशात करावा. त्याचप्रमाणे आकृतीबंधातील संवर्ग पदांव्यतिरिक्त उर्वरित पदांसाठी असलेली व आयुक्त तथा संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांच्याकडून विहीत करण्यात येणारी अर्हता, पदांची वेतनश्रेणी इत्यादी बाबी आदेशात नमूद कराव्यात.

(७) उपरोक्तप्रमाणे कार्यवाही करण्याकरिता आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांनी महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ च्या कलम-७६ (२) नुसार याबाबतचे अधिकार विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना प्रदान करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

(८) नगरपरिषद/नगरपंचायतीच्या आकृतीबंधातील राज्यस्तरीय संवर्गातील पदासाठीची अर्हता व भरती पद्धत ही सेवा प्रवेश नियमानुसार विहीत करण्यात आलेली आहे. त्यामुळे राज्यस्तरीय संवर्गातील पदांव्यतिरिक्त उर्वरित पदांवर समावेशनाची कार्यवाही करण्यात यावी.

(९) भुतपुर्व ग्रामपंचायतीतील नियमित कर्मचाऱ्यांचे नवनिर्मित नगरपरिषद/ नगरपंचायतीमधील मंजूर आकृतीबंधातील पदांवर समावेशनाने समायोजन करावयाचे असल्यामुळे, त्याकरिता वयाची अट असण्याचा प्रश्न उद्भवत नाही.

(१०) नगरपरिषद/नगरपंचायतीस हंगामी/रोजंदारीवरील पदे निर्माण करता येणार नाहीत. आवश्यकता वाटल्यास कामे कंत्राट पद्धतीने करून घेण्यात यावीत, अशी कार्यवाही करताना वित्त विभागाच्या यासंबंधीच्या आदेशानुसार कार्यवाही करण्यात यावी. कोणत्याही परिस्थितीत नगरपरिषद/ नगरपंचायती यांना कंत्राटी/मानधन/रोजंदारी कर्मचारी नेमता येणार नाहीत.

**५.** नवनिर्मित नगरपरिषदा/नगरपंचायतींमधील शासन मंजूर आकृतीबंधातील पदांवर भुतपुर्व ग्रामपंचायतीतील नियमित कर्मचाऱ्यांचे समावेशनाने समायोजन करण्याबाबत कार्यवाही करताना विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक यांनी उपरोक्तप्रमाणे कार्यवाही करावी. त्याचप्रमाणे सदरहू शासन निर्णयातील प्रस्तावनेच्या परिच्छेद क्र.१ व शासन निर्णय दि.०५.०७.२०१६ मधील परिच्छेद क्र.६ अन्वये विहीत करण्यात आलेल्या प्राधान्यक्रमानुसार कार्यवाही करावी. समावेशनाच्या अनुषंगाने कोणत्याही प्रकारच्या अडचणी उद्भवल्यास याबाबत आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांच्याकडून मार्गदर्शन प्राप्त करून घेऊन पुढील कार्यवाही करावी.

**६.** आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांनी नवनिर्मित नगरपरिषदा/नगरपंचायतींतील पदांवर भुतपुर्व ग्रामपंचायतीमधील कर्मचाऱ्यांचे समावेशनाने समायोजन करण्याबाबत विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक यांच्याकडून करण्यात येणाऱ्या कार्यवाहीबाबत नियमितपणे आढावा घ्यावा व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

**७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११९१५५०२०९८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Digitally signed by Jayasingrao N Patil
Date: 2017.01.19 15:58:10 +05'30'

**(ज. ना. पाटील)**
**शासनाचे सह सचिव**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव.
२. मा.विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
३. मा.मंत्री, वित्त व नियोजन यांचे खाजगी सचिव.
४. मा.राज्यमंत्री, नगरविकास यांचे खाजगी सचिव.
५. सर्व सन्मानीय विधानसभा/विधानपरिषद व संसद सदस्य.
६. मा.राज्यपाल महोदय यांचे सचिव.
७. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

८. मा.राज्य निवडणूक आयोग यांचे कार्यालय.
९. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.
१०. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.
११. मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी.
१२. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
१७. सर्व विभागीय आयुक्त.
१८. सर्व जिल्हाधिकारी.
१९. राज्यातील सर्व नगरपरिषदा/नगरपंचायती यांचे मुख्याधिकारी.
२०. सर्व मंत्रालयीन विभाग.
२१. नगर विकास विभागातील सर्व कार्यासने.
२२. निवडनस्ती/नवि-१४.

# शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक-एमसीओ-२०१५/प्र.क्र.१३९/नवि-१४, दि. १९.०१.२०१७ चे सहपत्र-१

## सहपत्र-१

नवनिर्वाचित / नगरपरिषद/ नगरपंचायत------------------, जिल्हा ----------- मध्ये समावेशन करणेबाबत तत्कालिन ग्रामपंचायत ----------- मधील कर्मचारी यांचे नियुक्तीचे ठराव, पगारपत्रक व हजेरी पत्रकाची तपासणी करून खालीलप्रमाणे नमूद अ.क्र. १ ते - पर्यंतचे ग्रामपंचायतीचे कर्मचारी हे त्यांच्या नियुक्तीपासून ते नवनिर्वाचित नगरपंचायत / नगरपरिषदेच्या प्रथम उदघोषणेच्या दिनांकापर्यत ग्रामपंचायतीमध्ये सातत्याने कार्यरत आहेत. अ.क्र. ----ते ----- मध्ये नमूद कर्मचारी हे प्रथम उदघोषणेनंतर ते ग्रामपंचायत स्थापनेच्या दिनांकापर्यत आहेत. कार्यरत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. तसेच उर्वरीत कर्मचारी अ.क्र. ते अ.क्र.----हे नगरपरिषद/ नगरपंचायतीच्या दिनांकानंतर कार्यरत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **कर्मचाऱ्याचे नाव** | **नियुक्तीचा ठराव क्र.** | **दिनांक** | **कायम ठराव क्र.** | **दिनांक** | **सध्याची वेतनश्रेणी** | **सध्याचे पदनाम** |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | | | | | | | |

जा.क्र.--------------------
दिनांक : ----------

सही / नाव
गटविकास अधिकारी
पंचायत समिती-----
जि.--

## शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक - एमसीओ-२०१५/प्र.क्र.१३९/नवि-१४,दि. १९.०१.२०१७ चे सहपत्र -२

सहपत्र-२

कर्मचाऱ्यांची ग्रामपंचायतीमधील नियुक्तीची व आकृतीबंधानुसार समावेशन करण्याबाबतची माहिती

| अ.क्र. | ग्रामपंचायती कडून वर्ग झालेल्या कर्मचाऱ्याचे नाव | ग्रामपंचायत ठराव | | ग्रामपंचायती कडील वेतन / प्रकार | कर्मचाऱ्याच्या प्रथम नेमणूकीचा दिनांक | कर्मचाऱ्याचे सध्याचे पदनाम | कर्मचाऱ्याची सध्याची वेतनश्रेणी | कर्मचाऱ्याच्या प्रथम / मुळ नियुक्तीचे पद | आकृतीबंधानुसार मंजूर पद | कर्मचाऱ्याची शैक्षणिक पात्रता | आकृतीबंधात विहित करण्यात आलेल्या मंजूर पदांची शैक्षणिक पात्रता | कर्मचारी आकृतीबंधानुसार शैक्षणिक पात्रता धारण करतात किंवा कसे | जिल्हापरिषदेकडून वेतनावर अनुदान मिळत होते अगर कसे | जिल्हापरिषदेने नियुक्ती देण्यास मान्यता दिली आहे अगर कसे | नियुक्ती नियमानुसार करण्यात आली आहे अगर कसे | नियुक्ती नियमानुसार नसल्यास कोणत्या नियमाचा भंग होतो. | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | क्रमांक | दिनांक | | | | | | | | | | | | | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ |
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |